प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
मौ. कांचनवाडी, गट क्र. १९ येथे राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या प्रस्तावित प्रशासकीय इमारतीच्या जागेभोवती कुंपण बांधणे व जमिनीचे सपाटीकरण करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र. बीजीटी १००७/प्र.क्र.२८ (अ)/इएक्ससी-४,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक : ११ मे, २००७..

**शासन निर्णय :** सन २००७-०८ या वार्षिक योजनेसाठी राज्य उत्पादन शुल्क विभागाला कार्यालयीन इमारती/निवासी इमारती बांधण्यासाठी रु. ५५०.०० लक्ष एवढा नियतव्यय मंजूर करण्यात आलेला आहे. या मंजूर नियतव्ययातून मौ. कांचनवाडी, गट क्र. १९ येथे राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या प्रस्तावित प्रशासकीय इमारतीच्या जागेभोवती कुंपण बांधणे व जमिनीचे सपाटीकरण करण्यासाठी येणाऱ्या रु. ७२,३६,६००/- इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. जमिनीचा नैसर्गिक उंचसखलपणा शक्यतो कायम ठेवून अत्यावश्यक तेथेच सपाटीकरण करण्यात यावे.

२. उपरोक्त कामावर होणारा खर्च सन २००७-०८ या वित्तीय वर्षात सार्वजनिक बांधकाम विभाग, मागणी क्र.एच-८,मुख्य लेखाशीर्ष-४०५९,सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च,०१ कार्यालयीन इमारती,१०१, बांधकाम (००) (१६) दारुबंदी व राज्य उत्पादन शुल्क याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-५ अनुक्रमांक-१, अन्वये "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका

"अंतर्गत परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( गौ. जो. रसाळ )
उप सचिव,महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-१/२( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र,मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
विभागीय उप आयुक्त, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद.
अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, औरंगाबाद.
जिल्हा कोषागार अधिकारी,औरंगाबाद.
मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमारती-२)(अर्थ-२), मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-७/विनियम ) मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती/इएक्ससी-४

*********